



**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

मंत्रालय मुख्य इमारत, पहिला मजला,मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh2-rfd@mah.gov.in

---

क्रमांक: गौखनि ५१अ/०२२२/प्र.क्र.८२/ख-२ दिनांक : ११ मार्च, २०२२

**विषय : गौण खनिज-गडचिरोली**
**सन २०१६-१७ मौजा मद्दीकुंठा, ता. सिरोंचा या वाळूगटाची जप्त केलेली अनामत रक्कम परत करणेबाबत.**
**- मे. सृष्टी कंन्स्ट्रक्शन वर्क्स, मॅनेजींग पार्टनर श्री. तोटला तिरूपती.**
**रा. बेगम पेठ, एक्स रोड, मंडल खमनपुर, जि. करीमनगर, तेलंगना राज्य.**

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे पत्र क्र.कार्या-२/अ.का.खनिज/कावि/१७५/२०२२, दि.२१.०२.२०२२ रोजीच्या पत्राच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, सन २०१६-१७ करीता मौजे मद्दीकुंठा ता. सिरोंचा या वाळूगटाच्या लिलावात भाग घेण्यासाठी मे. सृष्टी कंन्स्ट्रक्शन वर्क्स, मॅनेजींग पार्टनर श्री. तोटला तिरूपती यांनी रू.७८,७१,०००/- शासन जमा केली. सदर वाळूगटाचा दि.२७.०९.२०१६ घेण्यात आलेल्या ई लिलावान्वये मे. सृष्टी कंन्स्ट्रक्शन वर्क्स, मॅनेजींग पार्टनर श्री. तोटला तिरूपती यांना रू.४९,८८,५५,०००/- इतक्या सर्वोच्च रकमेस ५२,४७३ ब्रासकरीता सदर वाळूगट मंजूर करण्यात आला. तथापि लिलावधारक यांनी वाळूगटाकरीता लावलेली सर्वोच्च बोलीची रककम रू.४९,८८,५५,०००/- मधील ८ हा अंक चुकीने दोनदा दाबल्यामुळे लागलेली बोली रद्द करण्याची विनंती जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी केली.

तथापि, लिलावधारक यांची विनंती सिध्द न झाल्याने तसेच लिलावाची ¼ रक्कम शासनजमा न केल्यामुळे जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी दि.३.१०.२०१६ रोजीच्या आदेशान्वये लिलावधारक मे. सृष्टी कंन्स्ट्रक्शन ॲण्ड वर्क्स यांनी शासनजमा केलेली अनामत रक्कम रू.७८,७१,०००/- जप्त केली.

सदर आदेशाविरूध्द लिलावधारक यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्र.५८९३/२०१६ दाखल केली असता, मा. न्यायालयाने दि.२१.०३.२०१७ रोजी दिलेल्या आदेशाविरूध्द मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये सिव्हील अपील क्र.२२४/२०२२ दाखल केली असता, मा. सर्वोच्च न्यायालयाने दि.७.०१.२०२२ रोजी रू.७८,७१,०००/- रकमेचा परतावा देण्याबाबत शासनास आदेश दिलेले आहेत.

**०२.** मा. सर्वोच्च न्यायालयाने दि.७.०१.२०२२ रोजी पारीत केलेल्या आदेशानुसार सन २०१६-१७ मौजा मद्दीकुंठा, ता. सिरोंचा जि. गडचिरोली या वाळूगटाकरीता मे. सृष्टी कंन्स्ट्रक्शन वर्क्स, मॅनेजींग पार्टनर श्री. तोटला तिरूपती यांना जप्त केलेली अनामत रक्कम रू.७८,७१,०००/- (रू.अठ्यात्तर लाख एकाहत्तर हजार फक्त) लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**०३.** सबब मे. सृष्टी कंन्स्ट्रक्शन वर्क्स, मॅनेजींग पार्टनर श्री. तोटला तिरूपती यांना **रक्कम रु. ७८,७१,०००/- (रू. अठ्यात्तर लाख एकाहत्तर हजार फक्त)** इतकी रक्कम, त्यांनी सदर रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२१-२२ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०५.** सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०३१११७३२४६२५१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SADANAND
GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, pseudonym=F963BC6AD59D767D7C33C1B8350D778425D54B0E, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2022.03.11 17:34:59 +05'30'

**( स. गो. मोहिते )**
**कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, गडचिरोली**

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
५) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
६) निवडनस्ती “ख-२” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.